# महाराष्ट्र शासन

क्र. संकीर्ण ०८१९/प्र.क्र.५७४ /पोल ५ ब
गृह विभाग, मुख्य इमारत,
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२
दिनांक- १९ सप्टेंबर, २०१९

वाचा :-

१) शा.नि.,वित्त विभाग क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४,दि.२९.०९.२०१८

२) पोलीस महासंचालक कार्यालयाचा क्र.पोमसं/३९/४२/अं.नि.सा.अ.-महाजन(गट ११ नवी मुंबई) / १०२/२०१९ दि. ८.०५.२०१९ रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.

३) श्री.विजय राजाराम महाजन यांचे कायदेशीर वारसदार श्रीमती रेशमाबाई राजाराम माळी(महाजन) यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दिनांक २६.१२.२०१८ रोजीचा अर्ज

## आदेश

उपरोक्त क्रमांक २ अन्वये पोलीस महासंचालक कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती रेशमाबाई राजाराम माळी (महाजन) यांच्या क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागप्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९सप्टेंबर,२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार श्री.विजय राजाराम महाजन यांचे नामनिर्देशन नसल्याने त्यांचे कायदेशीर वारसदार **श्रीमती रेशमाबाई राजाराम माळी(महाजन) व श्री.राजाराम सुका माळी (महाजन)** यांना सानुग्रह अनुदान रूपये १०,००,०००/-(अक्षरी रूपये दहा लाख फक्त) मंजूर करत आहेत.

सदर "सानुग्रह अनुदान" श्री.विजय राजाराम महाजन हे दि.२५.०७.१६ पासून शासकीय सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि.२४.०८.२०१७ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च "मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी,१०३,अनुकंपा भत्ते, (००)(०६)-परिभाषित अंशदान/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००३१११०९०५२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2019.10.03 11:10:28 +05'30'

( संदीप ढाकणे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-** १) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई

२) जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव

३) समादेशक,रा.रा.पोलीस बल,गट ११,नवी,मुंबई/ (आहरण व संवितरण अधिकारी) यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव

४) श्रीमती रेशमाबाई सखाराम महाजन व श्री.सखाराम सुका महाजन,प्रियदर्शनी नगर, नगावबारी,देवपुर,ता.जि.धुळे.